**Convertion in Regular Temparary Establishment:-Shri.Ranganath R.Nagare working under Superintending Engineer, Nanded Irrigation Circle, Nanded**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता,नांदेड पाटबंधारे,मंडळ, श्री. रंगनाथ रामजी नागरे, मजूर**

# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : रुअआ-२००७/(१५८/०७)/आ (कामगार )
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः- ३०/०७/११

पहावेः-:१)अधिक्षक अभियंता,नांदेड पाटबंधारे मंडळ यांचे पत्र क्रःनांपामं/आस्था३/१३०८, दिनांक- ०८.०२.२०११
२)शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्रः-रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५,दिनांक २४.४.२००१.

**प्रस्तावना** :-

अधिक्षक अभियंता,नांदेड पाटबंधारे मंडळ अंतर्गत श्री.रंगनाथ रामजी नागरे यांची प्रथम नियुक्ती दि.१/२/१९८८ रोजी मजूरपदी रोजंदारी आस्थापनेवर करण्यात आली होती. त्यांना दिनांक १/४/९३ रोजी कामावरुन कमी करण्यात आले होते.त्याविरुध्द श्री.नागरे यांनी मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे दावा क्र.१५४/९३ दाखल केला. सदर दाव्याचा निकाल दिनांक ७/८/१९९३ रोजी लागला व श्री.नागरे यांना सेवासातत्य व मागील वेतनाच्या थकबाकीसह सेवेत पुनर्स्थापित करण्याच निर्णय झाला. सदर निर्णयाविरुध्द क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी मा.कामगार न्यायालय,जालना येथे दाखल केलेला संकिर्ण अर्ज युएलपी- क्र-२/९३, दि.१/०६/१९९६ च्या निर्णयाव्दारे फेटाळण्यात आले. यानंतर क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी श्री.नागरे यांना दिनांक ३१/७/१९९६ रोजी मजूर पदी रोजंदारी आस्थापनेवर पुनर्स्थापित केले. यानंतर वरील निर्णयाविरुध्द मा.औद्योगिक न्यायालय,जालना येथे दाखल केलेले युएलपी क्र-६५/९६ फेटाळण्यात आले. श्री.नागरे हे सेवेत सातत्याने कार्यरत आहेत.श्री.नागरे ह्यांचे सद्यस्थितीत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही. मा.कामगार न्यायालयाने श्री.नागरे ह्यांना सेवासातत्य दिले असल्यामुळे त्यांचा प्रथम नियुक्ती दिनांक विचारात घेवून शा.नि.दि.-२४.०४.२००१ मधील तरतुदीनुसार श्री.नागरे ह्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतच्या प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

अधिक्षक अभियंता,नांदेड पाटबंधारे मंडळ अंतर्गत श्री.रंगनाथ रामजी नागरे मजुर यांना

**कृ.मा.प**

त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र . | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.रंगनाथ रामजी नागरे, | रोजंदारी | मजूर ०१/०२/१९८८ | ०१/०२/१९९३ | मजूर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

२. श्री.रंगनाथ रामजी नागरे, यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

३. अधिक्षक अभियंता,नांदेड पाटबंधारे मंडळ, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला

जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

४. श्री.रंगनाथ रामजी नागरे,यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. श्री.नागरे ह्यांनी त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतल्यास मागील सर्व वेतनाच्या फरकाची थकबाकी पूर्णपणे शासनास सोडून देण्याबाबत हमीपत्र दिलेले आहे . त्यामुळे सदर थकबाकी त्यांना अनुज्ञेय होणार नाही.

५. परिच्छेद क्र.-४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित कर्मचारी हयांनी मागिल सर्व वेतनाच्या फरकाची थकबाकी पूर्णपणे सोडून दिलेली आहे.परंतू सदर रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचा-याकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही, अश्याप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०७३०१४३७५२००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२
अधिक्षक अभियंता,नांदेड पाटबंधारे मंडळ ,नांदेड
कार्यकारी अभियंता, पुर्णा पाटबंधारे विभाग, वसमतनगर
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ